**शासन सेवेत नियुक्ती होताना अपंग उमेदवारांना टंकलेखनाची परीक्षा उत्तीर्ण होण्यासाठी दोन संधी तसेच दोन वर्षे इतकी मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः अपंग २०१६/प्र.क्र.११६/१६-अ**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: १६ नोव्हेंबर, २०१६

**वाचा -**

१) **शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक संकीर्ण १११४/प्र.क्र.२००/१६-अ, दिनांक ४.९.२०१५**

**प्रस्तावना -**

भूंकपग्रस्त, स्वातंत्र्य सैनिकांचे नामनिर्देशित पाल्य, सन १९९१ चे जनगणना कर्मचारी, सन १९९४ नंतरचे निवडणुक कर्मचारी व पदवीधर/पदविकाधारक अंशकालीन कर्मचारी यांचेसाठी टंकलेखन परीक्षा उत्तीर्ण होण्याची नियुक्तीच्या दिनांकापासून कालमर्यादा २ वर्षे इतकी करण्यात आलेली आहे. त्याच धर्तीवर अपंग उमेदवारांना शासन सेवेत लिपिक-टंकलेखक पदावर सेवा प्रविष्ठ झाल्यानंतर मराठी/इंग्रजी टंकलेखनाची परीक्षा उत्तीर्ण होण्यासाठी काही अवधी देण्याची मागणी होत होती. टंकलेखन परीक्षा ही टंकलेखन संस्थेमार्फत एका वर्षातून दोन वेळा (मे/जून व नोव्हेंबर/डिसेंबर महिन्यात) आयोजित केली जाते. त्यानंतर सुमारे दोन महिन्याच्या कालावधीनंतर सदर परीक्षेचा निकाल घोषित केला जातो. सदर परीक्षेस बसण्याकरिता उमेदवारांना किमान ५ ½ (साडे पाच ) महिन्याचे टंकलेखनाचे प्रशिक्षण आवश्यक असते. या सर्व बाबी विचारात घेवून भूंकपग्रस्त, स्वातंत्र्य सैनिकांचे नामनिर्देशित पाल्य, सन १९९१ चे जनगणना कर्मचारी, सन १९९४ नंतरचे निवडणुक कर्मचारी व पदवीधर/पदविकाधारक अंशकालीन कर्मचारी यांचेसाठी टंकलेखन परीक्षा उत्तीर्ण होण्याची नियुक्तीच्या दिनांकापासून कालमर्यादा २ वर्षे इतकी करण्यात आलेली आहे. त्याच आधारे अपंग कर्मचा-यांनाही मराठी/इंग्रजी टंकलेखनाची परीक्षा उत्तीर्ण होण्यासाठी काही अवधी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय -

शासन सेवेत अपंग उमेदवारांना जर लिपिक-टंकलेखक पदावर नियुक्ती मिळाली, तर त्यांना टंकलेखनाची (इंग्रजी/मराठी) परीक्षा उत्तीर्ण होण्यासाठी नियुक्तीच्या दिनांकापासून २ वर्षाच्या कालावधीत व २ संधीत सदर परीक्षा उत्तीर्ण होण्यासाठी अवधी व संधी देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१११६१२२२५६१३०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Tikaram Waman Karpate

Digitally signed by Tikaram Waman Karpate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9395c596b57a69fe04109b8c8191e7389cff5eda3fac16c6f8263be7fbbd319d, cn=Tikaram Waman Karpate
Date: 2016.11.16 12:27:15 +05'30'

**टि.वा.करपते**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद/ विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई-४०० ०३२.
२. सर्व सन्माननीय विधानसभा/विधानपरिषद व संसद सदस्य, महाराष्ट्र राज्य.
३. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई -४०० ०३५.
४. मा. मुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
५. सर्व मा. मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६. मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७. शासनाचे सर्व अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव
८. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधान परिषद), विधानभवन, मुंबई.
९. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधान सभा), विधानभवन, मुंबई.
१०. सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई ३२
११. सचिव, राज्य माहिती आयोग, मुंबई ३२
१२. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
१३. सर्व विभागीय आयुक्त/सर्व जिल्हाधिकारी, महाराष्ट्र राज्य
१४. मंत्रालयीन विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख्, महाराष्ट्र राज्य
१५. सर्व महानगर पालिकांचे आयुक्त, महाराष्ट्र राज्य
१६. सर्व मुख्याधिकारी, नगरपरिषदा/नगरपालिका.
१७. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
१८. प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा, मुंबई, औरंगाबाद, नागपूर
१९. प्रबंधक, उच्च न्यायालय,अपील शाखा, मुंबई, औरंगाबाद, नागपूर
२०. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई, औरंगाबाद, नागपूर.

२१. प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त, मुंबई
२२. उप सचिव ( आस्थापना) सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
२३. सरकारी वकील, उच्च न्यायालय, मूळ शाखा व अपील शाखा, मुंबई , औरंगाबाद व नागपूर
२४. सरकारी वकील, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई, औरंगाबाद व नागपूर
२५. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१, मुंबई.
२६. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-२, नागपूर.
२७. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ (५ प्रती).
**त्यांना विनंती की, प्रस्तुत शासन निर्णय प्रसिध्द करण्यात यावा.**
२८. विधीमंडळ ग्रंथालय, विधानभवन, मुंबई (१० प्रती),
२९. राज्यातील सर्व महामंडळे, मंडळे आणि सार्वजनिक उपक्रमक यांचे व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य.
३०. सर्व मान्यताप्राप्त राजकीय पक्षांची मध्यवर्ती कार्यालये.
३१. निवड नस्ती/कार्यासन १६-अ.